आब्राहाम याप्रमाणें त्याला भेटले. अणखी असें झालें कीं
तो मोश्याजवळ होता तेव्हां मोशे रडला. "तूं कां रड
तोस?" असें विचारिलें असतां मोशे ह्मणाला कीं "ह
तरूण माझ्या पाठीमागून आला असतां माझ्या देशस
लोकांपेक्षां याचा मोठा समुदाय सौख्यलोकीं जाई
ह्मणून." तो पैगंबर पुढें असें सांगतो कीं "मग लेद्रा
ज्याच्या पलिकडे जाण्याची परमानगी नाहीं तेथपर्यं
मला नेलें. त्या झाडाचें फळ हेजार यांतल्या घागर
एवढें मोठें होतें आणि त्याचीं पानें हत्तीच्या कानाए
ढालीं मोठीं होतीं. म्या तेथें चार नद्या पाहून गाब्रीए
लाला विचारिलें, ह्या कोणत्या आहेत? तेव्हां त्याने उ
त्तर दिल्हें कीं "ह्यांतून दोन तर सौख्यलोकांतील अ
सतां त्यांमधून वाहतात आणि दुसऱ्या दोन ज्या बाहेरू
वाहतात त्या नील आणि युफ्राथ अशा आहेत." म
त्याने मला भेटीच्या† घराकडे नेलें त्या घरीं दररो
सत्तर हजार दूत जात असत. तेथें मजपुढें एक द्रा
रसाचें व दुसरें दुधाचें आणि एक मधेचें असीं तीन पा
ठेविलीं होतीं. मी त्यांतून दुधाचें घेऊन प्राशन के
त्यावरून गाब्रीएल मला ह्मणाला कीं हा तुजविषयीं आ
तुझ्या राष्ट्रांविषयीं शुभ शकूण आहे." दुसऱ्या दंतक
अणखी असें ह्मटलें कीं "जर तूं द्राक्षरस निवडिला अ
तास तर तुझें राष्ट्र नीट मार्गापासून बहकलें असतें
शेवटीं मी अल्लाच्या तक्तापासीं आलों तेव्हां पन्नासदां

---

* किंवा कमल वृक्ष.

† महमदी लोकांच्या कथेप्रमाणें यासारिखें एक घर आदामाला
विलें होतें.

माज करण्याविषयीं हुकूम मिळाला. तेथून परत येतांना
ोश्याजवळ आलों तेव्हां त्याने विचारिलें कीं "काय
करण्याविषयीं हुकूम झाला ?" त्याला मी ह्मटलें "दर-
ोज पन्नासदा नमाज करण्याचा." तो ह्मणाला, "रोज-
ोज पन्नासदां नमाज करण्याविषयीं तूं समर्थ आहेस
ाय ?" तेव्हां त्याने शपथ वाहून सांगितलें कीं "मला
ाणसांच्या गोष्टीविषयीं अनुभव आला आहे कारण कीं
स्राएल संतानानी हें परिमाण पूर्ण करावें ह्मणून मी यत्न
रून पाहिला पण त्यांच्याने तें पूर्ण करवेना. तर तूं आ-
ल्या प्रभूकडे जाऊन आपल्या राष्ट्राकरितां सूट माग."
सा मी परत गेलों तेव्हां त्याने त्यांतून दाहा नमाज उणे
ले. मग माघारे मोश्याकडे आलों असतां त्याने पूर्व-
र मसलत दिल्ह्यावरून मी फिरून परत गेलों तेव्हां
णखी १० ची सूट मिळाली. अणखी मोश्याकडे आल्या-
र त्याने तीच मसलत दिल्ही असतां मी परतून गेलों
व्हां दाहा नमाज करण्याचा हुकूम झाला. मोश्याने
र पूर्वींप्रमाणेंच ह्मटल्यावरून मी अणखी परतलों असतां
रोज पांच नमाजांचा हुकूम मिळाला. ह्या शेवटच्या
कुमाविषयीं मोश्याला कळविलें गेल्यावर अणखीहि सूट
ागण्याकरितां मला तो माझ्या प्रभूकडे पाठविणार होता
र मी ह्मणालों कीं माझ्या प्रभूला इतक्या वारंवार विनं-
ी केल्यावरून अणखी त्याकडे जाण्याविषयीं मला लाज
ाटती. इतकें ह्मणून त्याची आज्ञा घेतली आणि त्या-
शीं प्रार्थना केली."

ही सदर्हु हकीकत एक प्रकारची आहे दुसरीं तर
क्षां फारच निराळी आहे. ती असी कीं महमद

बिछान्यावर निजला होता तेव्हां तो दूत आपले सत्तर जोड पक्ष फैलाविलेले असतां त्याने त्याला दर्शन दिल्हें आणि महमदाला बुराक नामें पशूंवर बसवून डोळ्याच्या एका निमीशांत यरूशालेमास नेलें. तेथें खडकासीं तो पशु बांधून गाब्रिएलाच्या मागोमाग प्रकाशवंत शिडीने पहिल्या आस्मानास गेलों तेथें महाकाय कोंबडा होता तेथून दुसरें आस्मान ५०० फुट अंतरावर होतें तरी त्या कोंबड्याचें डोकें तेथवर पोहंचलें. दुसऱ्या आस्मानांत नोहा त्याला भेटला. अणखी तेथें एक दूत त्याला भेटला त्याच्या दोहों डोळ्यांमधील अंतर ७०००० दिवसांची वाट इतकें होतें. सातव्या आस्मानीं येशू ख्रीस्ताला त्यां पाहिलें. त्याने आपल्यासाठीं प्रार्थना कराव्या असें मह मदाने त्यापासीं मागितल्यावरून आपल्यापेक्षां त्याला श्रे मानिलें.

आतां हें स्वप्न होतें किंवा खरोखर त्याचा आत्मा किं त्याचा देह आस्मानांत चढला याविषयीं लोककथे एक मत नाहीं. विवेक दृष्टीने पाहिलें असतां कोण एकाची खात्री होईल कीं असें कांहींच झालें नाहीं. प हे त्याच्या मनाचे शुद्ध तरंग असे आहेत. ह्या गोष्ट मध्यें असंभव्यता किंवा पोकळ धिटाई यांतून कोण विशेष आहे हें सांगतां येत नाहीं. परंतु आरब लो कांला नवलयुक्त कथेची मोठी आवड आणि ही गो ज्याला सांगितली गेली त्यानीं ती मान्य केली असें जे आह्मास आढळतें तेव्हां या सर्वांवरून ही गोष्ट जगा आणि ईश्वराला तुच्छ मानण्याच्या चतुराईने बनावि असावी असें साफ नजरेस येतें.

आपल्या पक्षाकडील लोकांस केवळ नवलयुक्त दैव योगानें चकीत करावें ह्मणून ही बाष्कळ गोष्ट महम-दानें बनाविली असावी यावांचून त्याचा दुसरा एक उद्देश होता ह्मणून दिसून येतें. जो कोणी इस्लामाचा धर्म लक्ष देऊन पाहील त्याला हा धर्म आणि यहूदी लोकांचा ईश्वरस्थापित धर्म या उभयतांमध्यें अनेक गोष्टी कांहींशा सारख्या आहेत, आणि जितके होईल तितकी मोश्याची व आपली बरोबरी करावी आणि जितकी यहूदी धर्मांतील मुख्य विषयासीं ऐक्यता करता येईल तितकी करावी ह्मणून महमदानें साक्षेपेंकरून उद्देश धरिला होता असें साफ दिसूं येईल. रात्रींच्या सफर करण्याच्या कथे-मध्यें ज्याचीं नांवें दाखल केलीं आहेत ते ज्यांस यहूदी व ख्रिस्ती लोक देवाचे सेवक मानून त्यांचा सन्मान करीत होते असे गृहस्थ होते.

महमदाला हें पुरतें माहीत होतें कीं ईश्वराच्या गौरव-विशिष्ट स्थानीं त्याची आपणास भेट झाली आहे, व आपल्याला आकाशांतील खोल मर्मांची पुरती माहिती झाली आहे असी लोकांची एकदां आपल्यावर श्रद्धा बस-वितां आली ह्मणजे त्या पायावर जसी पाहिजे तसी इमा-रत बांधिता येईल. तेव्हांपासून पुढें त्यानें आपल्या धर्मसंबंधीं हरएक क्षुल्लक गोष्ट किंवा कृत्य जें सांगितलें तें लोकांनी विशेष देववचन असें मानिलें होतें. ह्या गोष्टींचें बरोबर स्मरण राखिलें गेलें आणि महमदाच्या मरणानंतर त्या सर्व एकत्र जमविल्या जाऊन सांप्रदायीक ग्रंथ असे रचिले गेले, त्याला सुन्ना ह्मणतात. यहूदी

लोकांमध्यें याच प्रकारचे तोंडाने सांगितलेले सांप्रदाय आहेत.

जेव्हां महमदाने आपल्या रात्रीची सफर याविषयीं आपला चुलता अल-आब्बस व अबुतालेबाची कन्या ओमहाना नामें आपली चुलत बहीण यांस सांगितलें तेव्हां त्या उभयतांनी ही गोष्ट इतकी असंभूत मानिली कीं त्याने लोकांस हें सांगू नये असी त्यांनी त्याजपासीं विनंती केली, पण तो ऐकेना. यावरून त्याचे कित्येक अनुसारी त्यास सोडून गेले. त्याच्या शत्रूंनी त्याचा उपहास केला परंतु अबुबेकर याने त्याचा अभिमान धरून ह्मटलें कीं जें महमद सांगतो त्यावर माझा विश्वास आहे. नजम नामें कुरानाच्या ५३ व्या सुऱ्यामध्यें त्याच्या प्रमाणीकपणाविषयीं लोकांची खातरी करण्याकरितां असीं वचनें आहेत. "हा तारा मावळतांना याची शपथ वाहतों कीं तुमचा सोबती महमद हा बहकला नाहीं, किंवा मार्गाबाहेर वळला नाहीं. तो आपल्या इच्छेने बोलत नाहीं. जो हुकूम त्याकडे पाठविला तो च हा आहे. जो पराक्रमाने समर्थ, बुद्धीसंपन्न त्याने हें त्यास शिकविलें आहे. तोच आस्मानाच्या उंच किनाऱ्यावर होता मग तेथून पैगंबराजवळ पोहंचून दोन धनुष्यांचें किंवा त्याहूनहि कमी अंतर राहीपर्यंत त्याच्या जवळ येत आला आणि पाठविलेला हुकूम आपल्या सेवकास दिल्हा. जें महमदानें पाहिलें त्याविषयीं त्याचें अंतःकरण लबाडी करीत नाहीं. अणखीहि त्याने त्याला आनुल्लंघनीय कमळ वृक्षापासीं पाहिलें; त्याच्या जवळ बिहिस्त याचा बाग आहे. त्या कमळ वृक्षाने जें गु

तें आच्छादिलें तेव्हां त्याची नजर चळली नाहीं व बह-
कली नाहीं; त्याने खरोखर आपल्या प्रभूचीं कित्येक
महान चिन्हें पाहिलीं होतीं."(५३)

आतां लोकांमध्यें महमदाविषयीं फारच विरोधभाव
माजला आणि गवगवा झाला यावरून त्याने मुसाब याची
मदत आनंदाने अंगिकारिली. हा आपल्या बरोबर धर्म
मतानुसारी ७३ असामी व त्यांशिवाय दुसरेहि अविश्वा-
सी लोक यांस घेऊन याथ्राब (मदिना) एथून परत आ-
ला होता. या मनुष्यानी महमदाला शपथपुरःसर वचन
दिल्हें कीं आह्मी आपल्या बायका व मुलें याप्रमाणें अं-
तःकरणपूर्वक तुला सर्व बेआदबीपासून राखूं. तेव्हां
त्यानेहि आपल्या तर्फेने शपथ वाहून ह्मटलें मी तुह्मासी
विश्वासुपणें वागेन आणि सहसा तुह्माला अंतर देणार
नाहीं. तो अणखी ह्मणाला, "सर्व गोष्टी आह्मामध्यें
आतां समाईक आहेत तुमचें रक्त तेंच माझें रक्त, तुमच्या
नाशाप्रमाणें माझा नाश. आपण मानापानाने एक-
मेकासीं बांधिले आहों. मी तुमचा मित्र आणि तुमच्या
शत्र्यांचा मी वैरी आहें. तेव्हां त्याचे शिष्य त्याला ह्म-
णाले, "परंतु जर आह्मी तुझ्या सेवेंत वधिले गेलों तर
आह्मांला काय प्राप्त होईल?" "बिहिस्त" असें महमदाने
प्रत्युत्तर केलें. हा करार त्या नगरांतील लोकानी मान्य
केला. असी सिद्धता झाल्यावर त्याने आपल्या सोबत्यांस
मक्कतून निघून मदिनास जावयास सांगितलें तथापि त्यां-
च्या मागें जाण्याविषयीं ईश्वरी परवाणगीची वाट पाह-
ण्याकरितां महमद स्वतः व अबुबेकर व आली हे मागें
राहिले.

मदिनेंतील लोकांसी असा करार झाल्याचें वर्तमान समजल्यावरून मेक्केतील महमदाच्या शत्रूस असा धाक पडला कीं त्याला न जाण्याविषयीं प्रतिबंध करण्याचा त्यानी निश्चय केला. या कारणास्तव त्यानीं सभा जमवून असें ठरविलें कीं त्याचा वध करण्याकरितां प्रत्ये क कुळांतील एक एक असामी निवडून घ्यावा. सर्व कुळानी सन्मानाचा किंवा दोषाचा वांटा घेतला असता हें केवळ एकलें हाशेम घराणें जें आपल्या भावाबंदाच्या वधाचा सूड उगविण्यास तयार होईल त्यास भय पडून तें असें कृत्य करण्यापासून राहील ह्मणून त्यानीं आशा धरिली.

ह्या कटाविषयीं बातमी महमदाला लागली. त्यानें आलीला सांगितलें कीं "माझ्या हिरव्या झग्याने तूं आपल्याला झांकून घेऊन माझ्या जागीं निजून राहा." इतकें बोलून आपण आबुबेकराच्या घरीं चुकवून गेला. इकडे त्या कट करणाऱ्यानीं त्याच्या खोलीभोंवता सकाळपर्यंत चौकी पाहरा करून उजेडल्यावर पाहूं लागले तों महमद आपल्याला चुकांडी देऊन गेला असें समजून आलें. महमदाने तर आबुबेकराला आपल्या बरोबर घेऊन त्याच्या घरींहून निघाला आणि मक्केच्या आग्नेय दिशेस थूर नामें एक डोंगर आहे त्यांतल्या गुहेंत जाऊन ते उभयतां आपल्या पाठीस लागणाऱ्यापासून तेथें तीन दिवस लपून राहिले. "एथें केवळ आपण दोघेच जण आहोंत "असें आबुबेकर ह्मणाला. महमदाने प्रत्युत्तर केलें कीं "एथें एक तिसरा, तो साक्षात आल्लाच आहे."

मोसलेम लेखक असी बतावणी करितात कीं कोरे

लोक त्या गुहेजवळ आले तेव्हां त्या गुहेच्या तोंडीं बाभळींचें झाड वाढलेलें व तिच्या फांद्यानी त्या गुहेचें तोंड झांकलेलें होतें व तिच्या फैलावलेल्या फांद्यांवर खबुतरानी आपलीं कोठीं करून त्यांत अंडीं घातलीं, यांशिवाय कांतिण्यानी त्यावर जाळीं केलीं होतीं. हीं लक्षणें पाहून आलिकडे कोणी त्या गुहेंत गेला नसावा असें त्यानी ठरविलें. आणि माघारें वळून दुसरे दिशेने धुंडावयास गेले. हे उभयतां तीन दिवस त्या गुहेंत लपून राहिले तोपर्यंत आबुबेकराची आसमा नामें कन्या दर संध्याकाळीं अंधारामध्यें त्यांच्यासाठीं अन्न पाणी आणून देत असे.

चवथ्या दिवशीं त्यानी धैर्य धरून जे उंट आबुबेकराने आणविले होते त्यांवर त्यानी बसून मोठा मार्ग सोडून युसुफ समुद्राच्या काठाकडून ते मदिनेकडे चालते झाले. लांब गेले नव्हते इतक्यांत स्वारफौजेने त्यांस आटोपिलें. त्या फौजेचा सेनापति सोराका इब्न मालेक नामें होता. आबुबेकराची तर पांचावर धारण बसली परंतु महमद त्याला धीर देतां बोलला, "घाबरूं नको अल्ला आपल्या सहित आहे." "सोराका हा भयंकर तोंडाचा योद्धा होता त्याचे कल्ले रांठ ढवळ्या केसांचे होते आणि त्याच्या बाहूवर शिरा तरतरीत दिसत होत्या. त्याने महमदाला आटोपिलें तेव्हां त्याचा घोडा दुपायावर होऊन त्या सहवर्त्तमान तो खालीं पडला. सोराकाला हें अश्वन्ह असें वाटलें. महमदाने ह्या अस्या त्याच्या भावना जाणून अशा प्रकारचें पांडित्य केलें कीं सोराकाने त्याची क्षमा मागितली आणि त्यास सुखरूपें जाऊं दिल्हें.

पुढें त्यांनीं कोबा नामें एक डोंगर जो मदिनेपासून एक कोसाच्या अंतरावर आहे तेथें येई तोंपर्यंत निर्विघ्न मार्ग क्रमिला. त्या ग्रामस्थ लोकांची ती मोठी आवडती जागा होती तेथें ते रोगी व अशक्त अशा मनुष्यांस पाठवीत असत कारण कीं तेथील हवा शुद्ध व आरोग्य अशी होती. अणखी तेथूनच फळफळाव मदिना शहरास पुरविले जात असत. तो डोंगर व त्याच्या आसमंतातचे प्रदेश तर द्राक्षमळे, खजूर व कमलें यांचीं बनें, माहाळुंगें नारिंगें डाळींबें अंजिर व पीचादिक झाडांचे बाग यांकडून भरून गेले आहेत. आणि त्यास नितळ पाण्याच्या पाटानीं पाणी दिल्हें जात असे. ह्या ठिकाणीं आल्यावर महमदाचा उंट आपल्या गुढघ्यावर मेटाखुंटीस येऊन पुढें जाईनासा झाला. महमदानें हें शुभ चिन्ह आहे असें सांगून तो कोबामध्यें चार दिवस राहिला. त्या उंटानें तेथें गुढघें टेंकिले या गोष्टीच्या स्मरणार्थ तेथें एक मस्जीद बांधिली आहे.

त्या गांवीं महमद असतां बोरैदा इब्न होसैद नामें एक नामांकीत सरदार व त्याच्या अंकीत सत्तर असामी त्याला मिळाले. हे सर्व सहाम कुळांतील होते. दुसरा एक नामांकीत शिष्य सालमन अल पार्सी (इरानी) हा त्याला त्याच गांवीं मिळाला. इस्पाहान याजवळ एक लहान खेडें आहे. तें त्याचें जन्मस्थान होतें असें ह्मणतात आहे. आणि एका दिवशीं ख्रिस्ती देवळामध्यें तो गेला असतां त्या लोकांच्या गंभीर भक्तीदरून असा चमत्कार झाला कीं ज्या मूर्त्तिपुजक धर्मामध्यें तो वाढला त्या धर्मा- चा त्यानें त्याग केला. पुढें तो धर्माचा शोध करीत

शांत फिरत असतां, शेवटीं अरबस्थानांत एक पैगंबर
घाला आहे असें वर्त्तमान त्याला एका वृद्ध पाद्रीने
ांगितलें, त्यावरून तो महमदाकडेस गेला. कांहीं व-
र्नी हा सालमन नावा लौकीकास चढला, व मक्केतील अ-
श्वासी लोक असें सांगतात कीं कुरान लिहिण्यांत त्याने
हमदाचें सहाय केलें. त्याविषयीं कुरानाच्या १६ व्या
ध्यायांत अशी सुचना आहेः "मूर्त्तिपूजक खरोखर ह्मण-
त कीं फलान्या माणसाने कुरान रचण्यांत सहाय केलें
हे परंतु ह्या माणसाची भाषा आजमी (पार्शी) आहे
ाणि कुरान तर शुद्ध अरबी भाषेत लिहिलें आहे!"

ज्या मोसलेमानीं पूर्वी मदिनेमध्यें आश्रय धरिला हो-
ते महमदाला भेटण्यासाठीं सामोरें आले आणि ह्या
गरांत शिष्य मंडळींची संख्या वाढत चालली आहे हें
मजल्यावर रबी महिन्याच्या १६ व्या तारिखेस प्रसिद्ध-
णें मदिनेंत त्याने प्रवेश केला. नगराच्या जवळजवळ
आला असतां वाटेने ५०० ग्रामस्थ त्यास भेटले.
ांस बसावयास उंट आणि छायेसाठीं ताडपत्राचा चां-
ा असें होतें आणि त्याच्या समोर त्यांनी पताकाप्रमाणें
क पागोटें सोडिलें होतें आणि मोठे शूर योद्धे त्याच्या
गें पुढें चालत असतां सर्व प्रकारच्या विजयाच्या समा-
ाने त्याने त्या शहरांत प्रवेश केला.

हें पळणें (आरबीमध्यें हिजरा) अरबी कालानुक्रमामध्यें
कारंभ असें आहे, एथूनच सर्व सन मोजले जातात.
जरा सनाचें प्रथम वर्ष हें खिस्ती सन६२२ असें आहे.

## अध्याय ३.

### महमदाचा उत्तर वृत्तांत.

आतां हा परागंदा झालेला महमद राजा होऊन ब
सला. तो मदिनेंत पोहंचतांच त्याला सैन्य मिळाले
तें सैन्य तर त्यांसी संसक्त, त्याच्या इच्छेनुरूप वर्त्तणारे
आणि त्याचे भोळे शिष्य असें होतें. तो एकदम जा
कामाच्या योजना करूं लागला, त्याने आपली कन्य
फतिमा इचें लग्न आलीसीं लावल्यावर पहिल्या पहि
आपल्याला राहण्याकरितां घर बांधिलें, आणि आप
प्रसिद्धपणें लोकांसमोर उपदेश व प्रार्थना करावी ह्मणू
आपल्या घरानजीक एक मसींद बांधिली. कारण व
तो आपल्या सैन्याचा अधिपति, लोकांचा न्यायाधी
आणि शिष्यांचा पालक असा झाला असतां, त्याच्या अं
राजकीय आणि धर्मसंबंधी असे दोन्ही अधिकार मिळा
होते.

त्याचा भाग्योदय होण्यासरसें त्याचें मतहि पाल
लागलें. हा काळपावेतों त्याने आपला धर्म पांडित्य
आर्जव अशा सामोपचाराने चालविला आणि मक्का सोड
ल्यापूर्वीं कांहीं जुलूम जबरदस्ती न करितां नुसतें गोड
गोड बोलूनच त्याने आपलें कार्य साधिलें होतें. "
लोकांस बोध कर, बोध करणें हेंच तुझें काम आहे, तुल
त्यांजवर अधिकार दिल्हा नाहीं." (कुरान. सुरा २८
तो मक्केंत होता तोंपर्यंत तो ह्मणत गेला कीं मी आ
ला धर्म वाढविण्यासाठीं कोणत्याहि प्रकारचा जुलूम क

जबरदस्ती करणार नाहीं. आणि जें कुरान त्याने
गांवांत प्रसिद्ध केलें त्यांतील बहुतेक वाक्यांत तो असें
ष्ट बोलला कीं माझें काम केवळ उपदेश व बोध कर-
याचेंच आहे. माझा धर्म कोणी स्वीकारावा ह्मणून
ंजवर जुलूम करण्याचा मला कांहीं अधिकार नाहीं
ाणि लोक विश्वास धरोत अगर न धरोत त्यांविषयीं म-
कडे कांहीं नाहीं; याविषयींचा सर्व मोसबा ईश्वराकडे
हे. "हे महमदा, आह्मी अणखी तुला हुकुम पाठवून
ांगितलें कीं तूं आब्राहामाच्या धर्माप्रमाणें चाल, तो
द्धर्मपालक होता, मूर्त्तिपूजक नव्हता. तूं ज्ञानाने आणि
गूर बोधाने मनुष्यांस आपल्या प्रभूच्या मार्गाकडे बोलाव
णि अत्यंत नम्रतेने त्यांसीं विवाद कर, कारण कीं कोण
र्गापासून वळतो आणि कोण नीट मार्ग धरितात हें
या प्रभूला पुरतेंपणें माहित आहे. याकरितां तूं सह-
ाने विरोध सोस पण ईश्वरी सहायावांचून तुला सहन-
होणार नाहीं. आणि अविश्वास्यांमुळें तूं खिन्न होऊं
को!" (सुरा १६.) "धर्माविषयीं कांहीं जुलूम नसो."
(रा २.) त्याने आपल्या अनुसाऱ्यांस जबरदस्ती करण्याचा
ुम नाहीं दिल्हा असें केवळ नव्हे, त्याने त्यांस असा
य केला कीं धर्मसंबंधीं जे कांहीं पाठलाग किंवा
ार्थ होतील ते तुह्मी नम्रतेने सोसून घ्यावे. आणि जेव्हां
चा खाजगत पाठलाग झाला तेव्हां तो कोणासीं का-
विरोध न करितां आपण आपलें जन्मस्थान सोडून दु-
या एका खेड्यांत जाऊन राहिला. पण हें जें अनु-
र्य व्रत त्याने बारा वर्षें संतत चालविलें तें आपली शक्ति
प आणि आपल्या शत्रूंची चढती कमान होती यावरू-

नच काय तें होतें असें दिसतें. कारण कीं मदिनेंती
लोकांच्या सहायानें आपल्या शत्रूसमोर आपण उभें रा
ण्यास समर्थ होतांच त्याच्या भाषणांत फरक पडल
त्यानें असें सांगितलें कीं "मला आणि माझ्या अनुसाऱ्यां
तरवार आदिकरून शस्त्रानें काफर लोकांपासून आप
बचाव करण्याविषयीं ईश्वरानें परवानगी दिल्ही." नंतर
व्हां त्याचा पराक्रम वाढला तेव्हां चढाई करून जाण्य
विषयीं ह्मणजे शत्रूवर हल्ला करणें, हरतऱ्हेनें मूर्त्तिपूजे
समूळ उच्छेद करणें आणि हा खरा धर्म अंगीकारण्य
साठीं लोकांस तरवारीच्या धारेवर धरणें या गोष्टींविष
आपल्याला हुकूम प्राप्त झाला असें त्यानें भासविलें. "काफ
लोकांसीं लढाई करण्याविषयीं तुह्मास निक्षून हुकूम दिल
आहे." (सुरा २.) "यास्तव सैतानाच्या मित्रांसी यु
कर, कारण कीं सैतानाची युक्ति अशक्त आहे." (सुरा ४
"अहो खऱ्या विश्वासणाऱ्यांनो, तुह्मी आपल्या शत्रूंपास
आपला बचाव अगत्य करा आणि निरनिराळ्या टोळ्य
नी किंवा सर्व मिळून लढाई करण्यासाठीं त्यांजवर च
करा." (सुरा ४.) "आणि ज्या महिन्यांत तुह्मी त्या
हल्ला करूं नये ते संपल्यावर जेथें तुह्मास मूर्त्तिपूजक सं
डतील तेथें त्यांचा वध करा, त्यांस कैद करून वेढा घाल
आणि त्यांच्यासाठीं सोईवार ठिकाणीं दबा धरा." (सु
९.) "तुह्मी जेव्हां अविश्वास्यांसीं भिडतां तेव्हां त्यां
मोठी कत्तल होईपर्यंत लढून त्यांचा शिरच्छेद करा, त्य
बंधनानें बांधा. मग लढाई संपल्यावर मरजी असल्य
त्यास तसें जाऊं द्या नाहींतर त्यांजपासून खंडणी घ्य
(सुरा ४७.) "निश्चय खऱ्या विश्वासणाऱ्यांस त्यांचे आ

माल मत्ता यांसुद्धां ईश्वराने खरेदी करून घेतलें आहे.
आणि ईश्वरासाठीं ते लढतात यास्तव बीहिस्त त्यांस देऊं केलें
आहे. ते मारोत किंवा मरोत तरी तौरात, इंजील आणि
कुराण यांवरून त्यांविषयीं हें वचन एकसारिखेंच निश्चित
आहे." (सुरा ९.) जे सुरे मदिनेमध्यें प्रगट केलेले त्यां-
मध्यें क्रूरता, अक्षमता आणि रक्तपात हीं लक्षणें विशेषें-
करून दिसून येतात व दुसरें प्रमाण नसतें तर त्यावरूनच
ठरवितां येतें कीं ते सुरे महमदाच्या पळण्यानंतर लि-
हिले होते. महमदाच्या शिष्यानी ह्या अभिप्रायाबर-
हुकूम वर्त्तणूक केली आहे, व मोसलेम सैन्याकडून जो
जाहीरनामा होत असे तो याप्रमाणें, "कुरान किंवा म-
रण अगर कर देणें." सांप्रत देखलि मुसलमानी रा-
ज्यांत दुसरे जे धर्मप्रकार राहतात त्या सर्वांस आपल्या
धर्माबद्दल सरकारांस पट्टी देणें प्राप्त आहे; आणि महम-
दाच्या कोणत्याहि मताविरुद्ध किंवा निंदेचें भाषण कोणी
केलें असतां त्याचा वध नाहींतर त्याची छळणूक झा-
ल्यावांचून तो राहणार नाहीं. अविश्वासी लोकांसीं वि-
वाद करणें यांविषयीं अगदीं मनाई आहे असें जरी नाहीं
तरी त्याचा अनंगीकार आहे. महमदाला देखील याप्र-
माणें कुराणांत बोध केला आहे. "याकरितां या गो-
ष्टीविषयीं त्यांस तूं आपल्यासीं वादविवाद करूं देऊं नको
पण तूं आपल्या प्रभूकडे त्यांस बोलाव कारण कीं तूं नीट
धरण धरितोस. पण जर ते तुजसीं विवाद करूं लाग-
तील तर तुह्मी जें करितां तें देव पुरतें जाणतो. ज्या
गोष्टीविषयीं आतां तुह्मामध्यें वाद आहे त्याविषयीं पुनरु-
त्थानांत देव तुमच्या मध्यें न्याय ठरवील." (सुरा २२.)

आतां महमदाला आपलीं मोठमोठीं कार्यें विशेष यश
स्वीपणें सिद्धीस नेण्यासाठीं सामर्थ्य प्राप्त झालें त्याने जी
तरवार गाजविली तिचा पराक्रम छपवून राखावा असे
त्याच्या मनांत नव्हतें. तथापि कोरेश लोकांस त्रास
देण्याकरितां त्याच्या हुकुमावरून त्याच्या लोकानी जी प
हिली त्यांवर स्वारी केली ती सफळ झाली नाहीं. त्या शत्रु
कुळाकडील एक काफला सुरीयाहून मक्केस जात आ
असें महमदास कळविल्यावरून तो काफला पाडाव करू
आणण्यासाठीं त्याने आपला चुलता हामजा याबरोब
तीस स्वारांची टोळी देऊन त्याला दौडीवर पाठविलें
परंतु ते काफल्याच्या जवळ गेले असतां त्याच्या संरक्ष
णार्थ तीनशें माणसें आहेत असें पाहून त्यांजवर हल्ला
करणें हें ठीक आहे असें समजून गुपचीप मदिनेस पर
गेले.

पेस्तर सालीं बेदर एथील लढाईमध्यें त्याने आपल्
सैन्यबळेंकरून जें यश मिळविलें तेणेंकरून मागील अप
शाचा डाग उडून गेला. त्या विजयाने तें साल महम
वृत्तांतामध्यें फार नामांकित झालें आहे. एक मात
काफला मक्केहून जात होता आणि त्याच्या संरक्षणार्थ अ
सोफियन व त्याबरोबर तीस चाळीस माणसें होतीं, हें पाह
महमदाची सूड उगविण्याची बुद्धि आणि लोभ हे प्रद
झाले. महमदाच्या हेरानी त्यास सांगितलें कीं ही मात
लूट अनायासाने तुझ्या हातीं येण्याजोगी आहे, तेव्हां त्य
आपल्या बरोबर कांहीं अनुसाऱ्यांस घेऊन त्यांचा पिछ
धरिला. परंतु त्याने त्यास गांठलें नव्हतें इतक्यांत अ
सोफियन याने आपल्या कुमकेसाठीं मक्केंतील आपल

शवांबंदांकडे एक जासूद फेंकला. जर आपण आबुसोफि-
नाची सुटका करण्याविषयीं उशीर करितों तर आपले
र्व सवदासूत व सामग्री गमावली जाती असें भय धरून
त्काळ साडे नऊशे मनुष्य निघाले. त्यांमध्यें मक्केतील
कित्येक श्रेष्ठजन होते. महमद तर केवळ तीनशें तेरा
शिपाई जे बहुतेक सांडणीस्वार होते त्यांसहवर्त्तमान ये-
णारी कुमक व काफला यांच्यामध्यें वाटेवर बसला; त्यांत
त्याहत्तर तर त्याचे पहिले शिष्य होते आणि बाकीचे
गाचे अनुसारी होते. सैन्याच्या न्यूनाधिक्याविषयीं भय
धरितां आपला अधिकार आपली अब्रू आणि कदाचित
आपला जीवहि धोक्यांत घालून महमदाने लढाई करण्या-
ा निश्चय केला. हें सैन्य तर आबुसोफियनाच्या मात-
र काफल्याच्या लुटीची आशा कांहीं वेळ सोडितां शत्रू-
या सबळ सैन्यासीं लढण्यास उद्युक्त झालें. तशांत
हमद आपल्या प्रार्थनेने त्यांस उत्तेजन देऊन परम थोर
श्वर याच्या नामाने निश्चय तुह्मास जय प्राप्त होईल, असें
ांस वचन देत गेला. परंतु आपल्याला ईश्वरी मदत मि-
ळल असी कितीहि त्याची खातरी होती तथापि त्याने
य मिळविण्याकरितां मानवी उपाय योजण्याविषयीं कांहीं
यगय केली असें नाहीं. आपल्या सैन्याची बाजू रा-
ावी ह्मणून त्याने लहान वरवंडी केली. आणि ज्या
ठिकाणीं त्यानी तळ धरिला होता तेथें एक ओढा वाहत
ोता ह्मणून सैन्यास पाण्याचा कांहीं तोटा पडला नाहीं.
त्रू त्या डोंगरावरून खाली उतरत असतां महमदाने आ-
ल्या पक्षाकडे लक्ष देऊन मोठ्याने ह्मटलें, "हे ईश्वरा, जर
ांचा नाश झाला तर मग ह्या पृथ्वीवर तुझी भक्ति कोण

करील? माझ्या लेंकरानो, धैर्य धरा, आपली फळी दृढ धरा, तुह्मी आपले तीर मारा, हा दिवस तुमचाच आहे.' सैन्याचें युद्ध होऊं लागल्यापूर्वीं मोसलेम पक्षाकडील आली, अलहारेथ, आणि हामजा असे तीन योद्धे यानी कोरेश पक्षांतील तिघांसीं द्वंद्वयुद्ध केलें त्यांत मोसलेम योद्धे विजयी झाल्यावरून उभय दळाला पुढील होईकाचें चिन्ह झालें. लढाईच्या आरंभीं महमद अबुबेकराबरोबर सिंहासनीं चढून आमच्या सहायासाठीं तीन हजार दुतांसहित गाब्रिएलाला पाठवावें असी ईश्वरापासीं आग्रहानें विनंती केली. परंतु जेव्हां आपल्या सैन्याची डळमळ होतांना त्यानें पाहिलें तेव्हां आपल्या प्रार्थनास्थळापासून त्यानें उडी मारून एका घोड्यावर आपलें आंग टाकिलें आणि मूठभर वाळू वर फेंकून ओरडला, "त्यांच्या तोंडाला काळिमा लागो." इतकें ह्मणून तो शत्रूवर तुटून पडला त्याचे अनुसारी धर्मपिस्यानी अजिंक्य झाले. कोरेश सैन्य ह्या विश्वासू सैनिकांची फळी फोडावयास किंवा त्याच्या तीव्र माराचा विरोध करण्यास समर्थ नव्हतें ह्मणून तें घाबरून पळून गेलें. कोरेश लोकांतील सत्तर शूर असामी त्या रणभूमीस मरण पावले, व सत्तर पाडाव झाले ह्मणून मोसलेमानी मोठा जयजयकार केला. मोसलेमाकडील तर केवळ चवदा असामी मरण पावले. त्यांची नामें वंशपरंपरेमध्यें दाखल केलीं आहेत, आणि धर्मा करितां मरण पावणाऱ्यांच्या यादींत मांडलेलीं आहेत आणि प्रत्येक धार्मिक मुसलमान भक्तिभावानें त्यांचें स्मरण करितो. कोरेश लोकांचीं प्रेतें त्यानी नग्न करून एका विहिरींत टाकिलीं. दोघे बंदिवान विशेष दोषी होते ह

णून त्यांस मरणाची शिक्षा ठरविली आणि वरकड बंदि-
वानांतील एक एकावर ४००० दिरम रूप्य खंड बसविला.
जी लूट हातची गेली होती तिच्या मोबदला ही रकम
प्राप्त झाली. कारण कीं कोरेश लोकांचा पराभव झाला
असतांहि आबुसोफियन हा युक्तीने तजवीज करून बहु-
तेक काफला यासुद्धां सुखरूप मक्केस गेला. पाडाव झा-
लेल्यांपासून जी खंडणी मिळाली आणि कांहींसी काफ-
ल्याचीहि लूट हातीं लागली होती, असें मिळून बरीच
रकम जमली होती तथापि विजयी सैन्यामध्यें वांटणीवि-
षयीं इतका तंटा झाला कीं थोडक्यावर चुकली नाहीं
तर मोठा घात झाला असता. महमदाच्या सैन्याचे
दोन भाग होते त्यांतून आनसार ह्मणजे मदतगार ह्मटले-
ले ते संख्येने बहुत होता ह्मणून ते मोठा वांटा मागूं
लागले. मोहाजरीन ह्मणूं लागले कीं आह्मी धर्मांगीकार
करण्यांत पहिले आहोंत सबब त्यांच्या पेक्षां अधिक, ना-
हींतर बरोबरीचा तरी वांटा आह्मास असावा. हा कज्जा
मिटवून टाकावा ह्मणून महमदाने एक बनावटी हुकूम
करून तो ईश्वरापासून आला असी बतावणी केली. त्या
लुटीचा पांचवा भाग आपल्यासाठीं व अमुक धर्मादाया-
च्या कामासाठीं एकीकडे काढून ठेविल्यावर बाकीचा ऐ-
ज समानतेने विभागून घ्यावा असी त्यांत आज्ञा होती.
बिसमिल्ला हिर्‌रहमानिर् रहीम. ते तुला लुटीविषयीं
हूकूम विचारतात, तूं सांग, लुटीचा माल विभागणें हें
आल्ला व पैगंबर यांकडे आहे याकरितां आल्लाला भ्या,
आणि आपापसांत सल्ला करा, आणि आल्ला व त्याचा
रसूल यांच्या हुकुमांत चालून आपण इमानी आहों असें

दाखीव". (सुरा ८.) "समजा कीं कांहीं जिन्नस तुह्माला लूट मिळाली असतां त्यांतील पांचवा हिस्सा आल्लासाठीं व रसूल व त्याचे कुळ व पोरपोरकें व गरीब व मुसाफीर यांच्यासाठीं आहे." (सुरा ८.) जो हिस्सा या प्रसंगीं महमदाने आपल्याकडे करून घेतला तो कित्येक हजार दिराम रुपें असा होता त्यांतून गरीब, पोर पोरके व मुसाफीर यांच्या कारणीं कितपत लाविला याविषयीं इतिहासांत कांहींच खबर दिल्ही गेली नाहीं.

बेदरच्या लढाईमध्यें भक्तांच्या लहानशा टोळी सहवर्तमान महमदाला जो जय प्राप्त झाला त्याविषयीं कुरानांत वारंवार मोठी बढाई मिरविली आहे आणि ईश्वराने आपण होऊन केवळ अद्भुत साक्ष महमदाविषयीं पटविली असे महमदी हमेशा सांगत असतात. "जीं दोन सैन्यें परस्परांसीं लढलीं त्यांमध्यें तुह्मास पूर्वीं एक चमत्कार दाखविला होता. एक सैन्य तर आल्लाच्या खऱ्या धर्माकरितां लढलें, परंतु दुसरें अविश्वासी होतें त्यानी आपल्या डोळ्यानी आपल्यापेक्षां विश्वासणारे दुप्पट असे पाहिले कारण कीं ईश्वर ज्यावर त्याची मरजी झाली त्यास आपल्या सहायाकडून बळाविती." (सुरा १२.) मोसलेम सैन्य जें होतें त्याच्या दुप्पट काफर लोकांच्या नजरेस पडलें या चमत्काराखेरीज ह्या आठवण धरण्याजोग्या प्रसंगीं अणखी दोन चमत्कार घडले ह्मणून ह्मटलें आहे एक असा कीं जी रेती महमदाने उधळली ती ईश्वरी सामर्थ्येंकरून असी जोराने शत्रूच्या मुखास लागली कीं त्यानी तत्काळ पाठ फिरवून पळ काढिला. "ह्मणून तुह्मी त्यां मारिलें नाहीं पण देवाने मारिलें. आणि त्या वेळेस ज

ंतीं फेंकली होती ती त्वां फेंकलीस असें नाहीं पण दे-
ाने फेंकली." (सुरा ८) दुसरा असा कीं पहिल्या-
हील ईश्वराने महमदाचें सहाय करण्यासाठीं एक
जार आणि नंतर तीन हजार दूत पाठविले. त्या दू-
ांचीं शिरें पांढऱ्या व पिवळ्या फेंठ्यांनी शृंगारित असतां
ांचे संबले त्यांच्या पाठीवर लोंबत होते. आणि हे आ-
ाशांतील मदतगार स्वार काळ्या पांढऱ्या घोड्यावर
सून आले. आणि ह्यांचा पुढारी गाब्रीएल दूत आप-
या हैजूम वारूवर बसून अघाडीस चालला होता. जरी
हमदाचीं माणसें शौर्याने लढलीं आणि ईश्वरी सुचना
ाल्यापूर्वीं ह्या जयाचा अवघा मान त्यांनी आपणास घे-
ला होता तरी कोरेश लोकांचा पराभव वास्तविक दूता-
 केला होता. आणि देवाने बेदरच्या लढाईंत तुम-
ी मदत केली होती. तेव्हां तुह्मी अशक्त होतां याक-
तां देवाला भ्या आणि त्याचे उपकार माना. जेव्हां
 मुसलमानांस ह्मणूं लागलास कीं तुमच्या प्रभूने तुह्मास
ंत पाठविली तेव्हां हें पुरें नव्हतें काय? आकाशांतून
न हजार दूत पाठविले. निश्चय जर तुह्मी टिकून
ंतां आणि जेव्हां जेव्हां ते तुह्मावर अकस्मात येतात
हां तेव्हां त्याचें भय धरितां तर पांच हजार दूत जे
पल्या घोड्यांवर बसले आहेत त्यांची मदत तुमचा
 तुह्मास पाठवील." (सुरा ३.)

ह्या गोष्टीनंतर कांहीं दिवसांनी महमदाने काआबवल्द
ऽ आश्रफ नामें एका यहूदी माणसाचा दग्याने घात
ा यावरून त्याचा खुनसीपणा उघडकीस आला. ह्या
ष्याचें महमदासीं हाडवैर होतें आणि तो कविता कर-

ण्यांत निपुण असतां बेदरची लढाई झाल्यावर मक्केस गेला आणि धर्मभ्रष्ट पैगंबर आपल्या लुटणाऱ्या टोळीसुद्धां लढत असतां कोरेश लोकांचे भाऊबंद कसे दुर्दैवाने रणांगणीं पडले याविषयींचें मनांत रुतण्याजोगें कवन करून सूड उगविण्यासाठीं त्यांस प्रवृत्त केलें.

नंतर तो मदिनेस परतला आणि तीं कवनें त्या नगरांत देखील त्याने ह्मणून दाखविलीं. हा कवी वेड्या-वाणी धिटाई करितो ह्मणजे असी निंदा करितांना आपण निर्भय राहूं असें मानितो हें पाहून महमदाची तळव्याची आग मस्तकास इतकी चढली कीं तो ह्मणाला, "ह्या अल आश्राफाच्या पुत्रापासून मला कोण सोडवील ?" तेव्हां कोणीएक महमदाचा नामधारी मोसलामाचा पुत्र जो आपल्या धन्याच्या कामांत तत्पर असा होता तो उत्तर देऊन बोलला कीं "हे देवाच्या पैगंबरा, मी तुझी सुटका त्यापासून करीन." कांहीं दिवसांनंतर काआब हा महमदाच्या एका शिष्याचें आगतस्वागत करीत असतां वधि-ला गेला.

त्या देशांत अनेक धर्मांतील भक्तांचा असा संप्रदाय होता कीं नभोमंडळांतील कोणीएका नियमित ठिकाण-कडे भक्ति करितांना आपलें मुख वळवावें. यहूदी तर यरु-शालेमाकडे वळत असत. अरबी लोक मक्केकडे, सा- उत्तर ध्रुवाकडे, पारसी पूर्वेकडे, यांप्रमाणें आपलीं तों- करून भजन करीत असत. मदिनेस महमद पहिल्या- आला तेव्हां आपल्या शिष्यांस यरूशालेमाकडे तोंड करू- नमाज करण्यास त्याने सांगितलें, कारण तें पवित्र नगर भविष्यभाष्याचें स्थान असें होतें. परंतु साहा स-

महिन्यानी त्याने आपला नेम बदलला, आणि तेव्हांपासून सर्वांनी मक्केकडे तोंड करून नमाज करण्याविषयीं हुकूम केला. आजतागाईत तो विधि चालत आला आहे.

महमदाने पहिल्यापहिल यरूशालेमाकडे तोंड करून नमाज करण्यास लाविलें त्यांत त्याचा काय हेतु असें जर पुसलें तर यहूदी लोकांची मरजी संपादावी असा हेतु होता ह्मणून दिसून येतें. परंतु ते आपल्या यहूदी धर्मावर पराकाष्ठेची निष्ठा ठेवितात असें जेव्हां त्यास पुरतें समजलें, आणि त्यांस इस्लामाच्या धर्मांत वळविण्याविषयीं आपल्या सर्व फुसलावण्या व आर्जवीं भाषणें व्यर्थ गेलीं असें त्याच्या लक्षांत आलें, तेव्हां त्याच्या मनोवृत्तींत मोठा पालट होऊन तो त्यांचा दुर्धर वैरी असा झाला, आणि तसाच आपल्या अंतकालपर्यंत त्यांसीं वैरभाव धरीत गेला. मदिनेंत नोका नामें एक यहूदी कूळ राहत होतें. तें त्या नगरीचें वतनदार होतें. एका दिवसीं त्यांजमध्यें कांहीं गडबड झाली हा प्रसंग पाहून महमदाने त्या लोकांकडे निरोप पाठविला कीं तुह्मी हा धर्म अंगीकारा नाहींतर युद्धास तयार व्हा. ते भयाभीत यहूदी उत्तर देतां बोलले कीं हाय हाय आह्मांला हत्यार धरण्याचें ठाऊक नाहीं, तो आह्मी आपल्या वाडवडिलांच्या धर्मांत टिकून राहणार; तर खरेपण रक्षणार्थ आह्मी लढलें पाहिजे असा जुलूम आह्मावर कां करितोस!" त्यावरून एक लढाई पंधरा दिवसपर्यंत होऊन तींत यहूदी लोकांचा पराभव झाला. महमद तर त्या सर्वांचा वध करण्यास सिद्ध होता पण त्याच्या मदतगारानी भीड खर्चिल्यावरून त्याने त्या पा-

डावांस जीवदान दिल्हें. त्यांची मालमत्ता जप्त केली गेली त्यांचीं हातेरें मुसलमानांनी आपल्यांत वांटून घेतलीं आणि ते संख्येने ७०० असामी असतां त्यांच्या बायका लेंकरासुद्धां त्यांस देशपार केलें. पुढें देशांच्या लढाई- मध्यें कोरैधांतील यहूदी कूळ कोरेश लोकांस सामील झाल्यावरून महमदानें त्यांचा दावा धरिला. यहूदी लोकांनी पंचवीस दिवस त्यासीं लढाई केल्यावर महम- दाने त्याजवर एवढा बळात्कार केला कीं ते विनकरारी त्याच्या स्वाधीन झाले. ते मदिनेंतील आपल्या पुरातन मित्राच्या भरवस्यावर राहिले आणि याविषयीं एका सन्मा नीक महत्तराने आमचा निवाडा करावा असें त्यांनी सा गितलें. परंतु त्यानेच त्यांस मरणदंड ठरविला. सा तरें यहूदी लोकांच्या पायांत बेड्या घालून त्या नग रांतील बाजारांत चालवीत नेले आणि तेथें एक गत्त त्यांच्यासाठीं तयार केली असतां त्यांत बळजोरीने तीं उतरविलें. जोंपर्यंत हा वध होत होता तोंपर्यंत हा ना वाचा पैगंबर बाजूस उभा राहून एकसारिखें टक लावू हें अघोर कृत्य अवलोकन करीत राहिला. त्याने त्यांच्य बायका व लेंकरें पाडाव करून घेतलीं, व त्यांचीं घरें जमिनी मदिनेंत पळून आलेल्यांस दिल्ह्या; आणि हा तरें तर विजयी सैन्यास देऊन टाकिलीं. पाडाव केले ल्या स्त्रियांमधील रिहाना नामें अत्यंत सुंदर स्त्रीला मह मदाने मोठा आयास करून आपल्या धर्मांत आणिं आणि त्याने तिला आपल्यासाठीं ठेविलें. त्याने पू अबुबेकराची आयेशा नामें कन्या व जामाची सवद नामें कन्या अशा दोन लग्नाच्या बायका केल्या होत्य

बेदरच्या पराभवामध्यें त्या काफल्याचा पाठींबा जो अबुसोफियन होता त्याने इराक प्रांताच्या पूर्वेकडून फेरा करून सुरीयाकडे दुसऱ्याने जाण्याचा निश्चय केला. जे उदमी त्यांच्या संगतीं होते त्यांजपासीं पुष्कळ ऐवज होता त्यांची वाट मारावी ह्मणून महमदाने जेईदाबरोबर पांचशे स्वार देऊन त्यांजवर पाठविले. त्याला ती लूट प्राप्त झाली असतां ती घेऊन तो मदिनेस परत आला. महमदाने त्या लुटीचा पांचवा हिस्सा घेऊन बाकीचा ऐवज लुटणाऱ्यांस वांटून दिल्हा.

पुढल्या वर्षीं कोरेश लोकांनी तीन हजार सैन्य पाठवलें त्यांत दोनशें स्वार आणि सातशें कवचधारी मनुष्यें होतीं त्यांचा सेनापती आबुसोफियन होता. आणि त्याची नायको हेंदा ही त्याच्या संगतीं गेली. त्यांनी मदिनेपासून तीन कोसांवर धूचौलैफा नामें गांवापासीं तळ धरिला. महमदाने तर मदिनेच्या उत्तरेस दोन कोसांवर ओहूद नामें डोंगराच्या तळीं एका गांवीं तळ धरिला. आणि पिछाडीस आपल्या मनुष्यांतील पन्नास मोठे शूर तिरंदाज ठेवून त्यांस ताकीद केली कीं आपलें ठाणें सहसा सोडूं नये. शत्रू सैन्यांत उजव्या तर्फेस खालेद सरदार होता, डावीकडे अक्रेमा, मध्यभागीं आबुसोफियन, आणि राखून ठेवलेल्या तुकडीवर हेंदा ही सरदारीण होती. अणखीहि दुसऱ्या पंधरा नायकिणी होत्या. त्या तंबूर बाजविण्याने समरास जे त्यांचे देशस्थ पडले त्यांविषयीं शोक करण्याने, आणि "धैर्य धरा, अब्दल दूराच्या शूर पुत्रांनो, धैर्य धरा," असें वारंवार पुकारण्याने त्या सैन्यास उत्तेजन देत असत. पहिली उठावणी तर महमदाने केली

तेव्हां त्याच्या सैन्याने कोरेश सैन्याच्या मधोमध मुसळी देऊन त्यांस पळविलें. त्यांचा मुख्य निशाणदार तर मारला गेला आणि त्यांची मोठी दाणादाण झाली. परंतु ह्या तिरंदाजांनी लुटीसाठीं उतावळे होऊन आपलें ठाणें सोडलें. यावरून खालेद आपल्या स्वारांसुद्धां त्याच्य पिछाडीस आला, आणि त्याने "महमद मारला गेला" असें ओरडतांना मोसलेम सैन्यास मागें हटविलें. त्यान पुन्हा सावरण्याविषयीं महमदाचे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले त्याचा जीव तर थोडक्यावरून चुकला होता. त्याच चुलता हमजा आणि त्याचा निशाणदार मुसीब हे ठा मारले गेले. आणि अबुबेकर, ओमार आणि ओथमान घायाळ झाले. हे घायाळ झालेले योद्धे अस्या सित फिने मागच्या मागें निघून गेले कीं अबुसोफियनाच्य हातीं ह्या जयांत कांहींच लागलें नाहीं; परंतु पुढल वर्षीं मी तुला भेटेन असें महमदापासून वचन मात्र मि ळालें. हा पराभव झाल्यावरून महमदाचे अनुसारी संत झाले. कोणी कोणी तर हा आपला पुढारी खोटा पै बर आहे असी त्याची निंदा केली. दुसरे तर आप नातलग गमावल्यावरून क्रोधाक्रांत झाले.

त्याचें सांतवन करण्यासाठीं महमदाने त्याच्या नुकर नीचा दोष जे त्या लढाईत होते त्यांतून कित्येकावर तला. आणि जे रणीं पडले त्यांच्या दैवीं ईश्वराने घातलें तें टळणार नाहीं, ते सत्य धर्मामुळें मरण पा असतां सौख्यस्थानीं गेले आहेत असें त्याने त्यांस नि राने सांगितलें. कुरानांतील हीं पुढील वचनें त्या प्रस दिल्हीं गेलीं. असें ह्मटलें आहे, "ज्यांनी आपला

ोडिला आणि जे आपल्या घरांतून बाहेर घालविले गेले
ाणि माझ्यामुळें ज्यानी सोसिलें व जे लढाईंत मरण पा-
ले आहेत, निश्चय मी त्यांचीं दुष्कर्मे निरसन करीन
ाणि मी त्यांस ज्या बागाला नद्यांकडून पुरवठा आहे
ांत नेईन ही देवापासून आणि देवासहित जी देणगी
ी अति उत्तम देणगी आहे. देशांतील अविश्वास्यांचा
मृद्ध व्यवहार तुला न फसवो. हा तर क्षणभंगुर संग्रह
ाहे आणि मग नरकांत त्यांची फेड दिल्ही जाणार
ाहे; ती तर इंगळांचें अंथरूण असी आहे, परंतु जे
ापल्या प्रभूचें भय धरितात त्यांस ज्या बागांतून नद्या
हतात ते प्राप्त होतील. ते त्यांत निरंतर राहतील हें
वाचें वरदान आहे. कारण कीं क्षणभंगुर जगीक
लिवारीपेक्षां जें देवापासीं आहे तें नीतिमानासाठीं अधिक
त्तम आहे. हे खऱ्या विश्वासू, सहनता धर आणि ती
ढविण्यास प्रयत्न कर. आणि स्थिर बुद्धि धर आणि
श्वराला भी ह्मणजे तूं धन्य होसील."

ह्या पराभवावरून जो मनोभंग झाला तो दूर करावा
णून महमदाने उमीया नामें एका मोठ्या वजनदार
ुष्याची हेंद कन्या बायको करून घेतली; ती विधवा
ती; ती आपल्या नवऱ्यासहित हाबसी देशांत जे परा-
ग झालेले त्यांतील होती. ती अठ्ठावीस वर्षांची होती,
ला एक पुत्र साल्मा नामें होता त्यावरून तिला उम-
ल्मा ह्मणजे साल्माची आई असें ह्मणत असत. ती
शेष सुंदर असतां अबुबेकराने व उमर याने तिला बा-
को करून घेण्यास पाहिलें पण साध्य झालें नाहीं.
मदाला देखील पहिल्याने अडचण पडली होती. ती

ह्मणाली, "आहाहा देवाच्या पैगंबराला मजपासून काय सुखोत्पत्ति होणार बरें? मी तर एक तरूण नाहीं तशांत मला एक पुत्र आहे. आणि मी परस्त्रीशंकित आहें.' महमदाने प्रत्युत्तर केलें, "तुझ्या वयाविषयीं ह्मटलें तर त मजपेक्षां फार धाकटी आहेस; तुझ्या पुत्राविषयीं तर मी त्याचा बाप असा होईन; तुझ्या संशययुक्त स्वभावा विषयीं तर आल्लाने तो समूळ काढून टाकावा असी मी त्याची प्रार्थना करीन."

मुसलमान लोकांच्या इतिहासांत हिजरा शकाच्या चवथ्या वर्षी ज्या असादी कुळांतील लुटारूनी मदिनेच्या प्रदेशांत स्वारी करण्याविषयीं धाक घातला होता त्यांच्या टोळीचा मोड करण्याविषयींचा मजकूर आहे. महमदाने आपलीं खासगींचीं पन्नास माणसें अगोदर त्याच्या प्रदेशीं पाठवून त्यांस येऊं दिल्हें नाहीं. ह्या माणसां असी मातबर लूट मिळाली कीं मेंढरांचे कित्येक कळ खेरीज करून प्रत्येक माणसाच्या सातसात उंट वांटणी आले. सोफियन खालेब याचा वध करावा ह्मणून मह मदाने धूल महद्रत याला अखत्यार दिल्ह्यावरून त्या त्याला मारिलें आणि महमदाने त्याला सन्मानाची निश णी ह्मणजे आपण जी काठी वागवीत असे ती त्या इनाम दिल्ही. धूल महद्रत याला ती काठी इत विशेष वाटली कीं कधींहि तो तिला विसंबला ना आणि तो पुरला तेव्हां ती काठी त्यासहित खाचेंत पुर होती. लोकांची श्रद्धा आपणावर बसविण्याविषयीं म मदाला कठीण गेलें नाहीं. एक खुनी दुसऱ्या खुन्य त्याच्या अपराधाकरितां आपली हातीं धरण्याची का

इनाम असें देतो ह्मणजे त्याची जन्मभर श्रद्धा झाली. दुसराहि दगा करून खून करण्याचा प्रयत्न केला होता परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. महमदानें आमजू आणि दुसरा एक मनुष्य यांस मक्केस जाऊन अबुसोफियनाचा नाश करण्यासाठीं मदिनेहून पाठविलें होतें परंतु त्याचा बेत फुटल्यावरून त्यांस पळून जाणें प्राप्त झालें.

एधल व अलफाऊन ह्या गांवानीं आपले मुत्सद्दी महमदाकडे मदिनेस पाठवून मागितलें कीं तुमच्या धर्माची आह्माला माहिती करून देण्यासाठीं शिक्षकांस पाठवावें. यावरून अलराजी नामें एक झऱ्यापासीं साहा शिक्षक जाऊन पोहंचले असतां त्यांजवर त्या मुत्सद्यानीं हल्ला करून तिघांस जिवें मारिलें आणि वरकडांस कैद करून नेलें. त्यांतील एक चुकांडी देऊन जाण्यास प्रयत्न करीत होता ह्मणून धोंडमार करून त्याचा जीव घेतला. दुसरे दोघे जन कोरेश लोकांला दासपणांत विकत दिल्हे. त्यानीं मक्केंत आल्यावर त्या उभयतांस जिवें मारिलें. याप्रमाणेंच दुसऱ्याहि सत्तर शिक्षकांची दशा झाली त्यांस नेदजेद याच्या प्रांतांत पाठविलें होतें. हा डोंगराळ प्रदेश आहे व तें कित्येक फिरणाऱ्या कुळांचें स्थान आहे. ज्या राजाकडे त्यांस शिफारस करून पाठविलें होतें त्यानेच त्यांतील एकुणहत्तर असामीस तरवारीनें मारिलें आणि केवळ एकच निभावला.

ज्या वर्षीं ही गोष्ट घडली त्या वर्षीं जुगार खेळणें व द्राक्षरस पिणें हें महमदाच्या शिष्यानीं वर्ज करावें ह्मणून देवाकडची हुकूम आला होता. द्राक्षरसाची मनाई करण्याचें वास्तविक कारण येणेंप्रमाणें झालें होतें. हा

पैगंबर एका दुपारीं आपल्या मित्राच्या घरीं गेला होता
तेव्हां तेथें लग्नाच्या समारंभांत वऱ्हाडी व आमंत्रित
मिळून उत्साह करीत होते. परंतु त्याच घरीं तो
दुसऱ्या दिवशीं गेला होता तेव्हां जमिनीवर रक्त व छिन्न
भिन्न अवयव इकडे तिकडे पडलेले असे त्याच्या दृष्टीस
पडले. त्याचें कारण त्यास कळलें कीं मेजवानींत
लोक द्राक्षरस पिऊन मस्त झाले ह्मणून असा अनर्थ
घडला. त्या मनाईवरून बहुतेक त्या वेळचे लोक मह
मदाला अनुसरण्याला नाखुष झाले. तथापि दुसरे
जे द्राक्षरस प्रकृतीस व नीतीस बाधक आहे असें समजून
त्यापासून दूर राहिले ते ह्याच मनाईवरून महमदाला
अनुसरण्यास प्रवृत्त झाले.

अबुसोफियनाला बेदर एथें भेटण्याविषयींचा जो क
रार केला होता त्याचें विस्मरण झालें नाहीं. महमद
त्या ठिकाणीं जाऊन आठ दिवस राहिला. अबुसोफियन
तर त्याला भेटायास निघाला खरें पण अशू अल तरीक
एथें किंवा मखाबा एथें पोहंचल्यावर त्याचें धैर्य खचलें
आणि तो माघारा घरीं गेला. महमदाने त्याच्या भित्रे
पणाविषयीं असें सांगितलें कीं देवाच्या धमकावण्याने तो
मागें फिरला.

सुरीयाच्या सीमेवर दौमत अलजांदाल नामें एक गाव
कित्येक रानटी अरबलोकांकडे होतें. ते अरब ज
ळच्या प्रांताला त्रास देत व त्या वाटेने जे वाटसरू जा
ईत त्यांस लुटीत असत. ह्या लुटारूंवर महमदा
हजार मनुष्यांनशी स्वारी केली. तो तेथें पोहंचतां

ा लोकांनी तें गांव सोडून दिल्हें, आणि महमद बहुत
ूट घेऊन परत आला.

ह्याच वर्षीं ज्या शत्रूला महमदानें उपद्रव दिल्हा
ोता त्यांनी त्यावरून मोठा कट केला होता. मक्केंतील
ोरेश लोक, नेदजेद यांतील घातफानी कूळ आणि ना-
ीर व कोरैधा यांतील यहूदी यांनी बारा हजार मनुष्यां-
शीं मदिनेला वेढा घातला. इकडे त्यांच्या येण्यापूर्वीं
हमदानें नगराभोंवता खोल खंदक करून त्याच्या संरक्ष-
ार्थ तीन हजार मनुष्य जमा केले. घातफानी लोकां-
ी पूर्वेकडे खोऱ्यांत वरल्या बाजूवर ठाणें धरिलें. आणि
ोरेशांनी पश्चिमेस खालच्या बाजूवर धरिलें. असें अस-
ां त्या नगराच्या रक्षकांवर तीरांचा व गोफणगुंड्यांचा
डिमार केला. त्यांच्या डेरे राहोट्या वादळानें उलट-
ा गेल्या. तेथें बहुत चमत्कार घडले, ह्मणून मुसल-
ानांनीं लिहिलें आहे. वेढा घालणाऱ्यांमध्यें कलह ला-
न फुटाफुट व्हावी असे महमदाच्या हातीं उपाय होते
सें प्रमाण आहे. मुख्य स्वार सरदारांतील एक आम्रू
ानें खंदक मोर्च्यावर चढून जाऊन मोसलेमांतील मुख्यानें
ऊन मजसीं लढावें ह्मणून बोलाविलें. आलीनें आपल्या
लत्याचें युद्धामंत्रण स्वीकारिलें असतां आम्रू त्याला ह्म-
ाला, "हे पुतण्या, तुला मारिलें असतां मला केवढी खु-
ाली वाटेल!" आलीनें प्रत्युत्तर केलें, "नाहीं काका,
ाला मोठी खुशाली होईल तो मीच तुह्माला मारण्यांत."
उभयतांहि घोड्यावरून खालीं उतरले. त्यांनीं लढा-
ं धूळ उधळिल्यावरून ते दिसेनासे झाले, केवळ तर-
ारीची चकमक मात्र कानीं पडली. धूळ शमली तेव्हां

आली आपल्या चुलत्याच्या छातीवर गुडघे रोवून त्या
नरडी कापतांना दृष्टीस पडला. मग त्याने दुसऱ्या श
सहि ऊर्ध्वपंथास धाडिलें. आणि तिसऱ्यास तर माघ
पिटवून लाविलें. शत्रुसैन्य तर थकलें, त्यांचा हिरमं
झाला, त्यांची फुटाफूट झाली असें असतां पहिल्याने क
रेश लोक आणि मग घाफतानी लोक यांचा भया
होऊन त्यांनी वेढा उठविला, आणि थेट मक्केचा र
धरिला. त्यांचें मागें हटण्याविषयीं महमदाला वर्तम
कळलें असतां तो बोलला, "पूर्व वाऱ्याच्या योगाने म
हा जय प्राप्त झाला आहे."

ह्या प्रसंगीं कोरैधांतील यहूद्यांचें कसकसें पारि
केलें हें तर मागेंच सांगितलें आहे.

ही तर खंदकाची लढाई किंवा राष्ट्रांची लढाई हं
असी जी मुसलमान लेखकानी नामांकित मानिली ती है
आहे. कुरानाचा तेहतीसावा "अहजाब" या नामें
सुरा तो याजविषयींच आहे. "अहो विश्वासणाऱ्या
तुह्मावर फौजा आल्या तेव्हां आल्लाची कृपा तुह्मावर
ली तिची आठवण करा. मग त्याजवर वारा आणि
फौजा तुह्मी पाहिल्या नाहींत त्यांस आह्मी पाठविलें. अ
जें कांहीं तुह्मी केलें तें आल्लाने पाहिलें आहे. जेव्ह
तुह्मावर वरच्या बाजूने व खालून आले आणि तुमचे
तळमळूं लागले आणि प्राण कंठास आले आणि अ
विषयीं तुह्मी भलभलत्या कल्पना कल्पूं लागला. * *
जो आल्लाची व शेवटल्या दिवसाची आशा धरितो अ
आल्लाची आठवण बहुत वेळ करितो त्याला रसूल
गला नमुना झाला आहे. ईश्वराने अविश्वास्याला

च रागे अरण्यांत फिरवून लाविलें. त्यांच्या हातीं
ां भलेपण लागलें नाहीं. आणि मुसलमानाची
ई आल्लाने उचलून घेतली आणि आल्ला शक्तिमान
ाक्रमी आहे."

ाठवण असेल कीं महमदाचा दुसरा शिष्य त्याचा
र जेईद हा होता. तो हा नवा धर्म अंगीकारण्या-
आपल्या धन्याच्या दासपणांतून मुक्त झाला. त्या-
हानपणीं फिरस्त्या अरबी लोकांच्या टोळीने उच-
नेऊन महमदाला किंवा कादिजाला विकत दिल्हें
कांहीं वर्षें गेल्यावर तो मक्केंत आहे असें त्याच्या
ा थांग लागल्यावरून तो त्या नगरांत गेला आणि
सुटका करण्यासाठीं मोठी रकम सादर केली पण
ापल्या धन्याला सोडायाचा नाहीं असें जेईदाने
ावरून महमदाने त्याला हातीं धरून काआबाच्या
ा पाषाणाकडे नेलें आणि तो माझा पुत्र व
दार आहे असें प्रसिद्धपणें त्याला अंगीकारिलें.
त्तविधानाला तो बाप राजी झाला आणि तेव्हांपा-
ईद हा महमदाचा पुत्र असा लोकांस माहीत झा-
नवा धर्म स्थापन केल्यावर त्याने त्याला जैनाब
दाची चुलत बहीण) ही बायको करून दिल्ही,
ोवर तो कित्येक वर्षें सुखाने राहिला.

ह्मी ज्या वर्षाची हकिकत पाहत आहों त्या वर्षीं
ाने जेईदाच्या बायकोविषयीं लंपट होऊन समारं-
ासीं लग्न लाविलें. सर्व प्रकारचे अरबी मोलवान
दार्थ मेजवानींत केले होते, तींत स्त्रीपुरुषांस आ-
केलें असतां मोठा समुदाय मिळाला होता. ह्या

लग्नावरून महमदाचे बहुतेक शिष्य आपल्या मनांत डच
कले. हीं नवरी तर त्यांच्या लेखीं केवळ महमदाचं
सूनच होती. हे संशय दूर करण्याकरितां महमदानें
कुराणाच्या तेहतिसाव्या सुऱ्यांत दुर्बुद्धीने याप्रमाणें ह्मटलें

"जेव्हां ईश्वर आणि त्याचा रसूल हे कांहीं गोष्ट
ठरवितात तेव्हां आपल्या गोष्टींविषयीं ठरविण्याचा अख
त्यार कोणी विश्वासणारा पुरुष किंवा स्त्री यांस नाहीं
आणि जो कोणी ईश्वराची आणि त्याच्या पैगंबराची अवज्ञा
करितो तो उघड भ्रांतीने वाट चुकला आहे. आणि ज्याज
वर ईश्वराने कृपा केली व त्वांहि कृपा केलीस त्यास जेव्हा
तूं बोलूं लागलास 'आपल्या बायकोला तूं आपल्यापासं
राहूं दे आणि ईश्वराला भी,' आणि एक गोष्ट आ
पल्या मनांत लपवून ठेवीत होतास, जी ईश्वर प्रगट करा
यास पाहत आहे त्याची आठवण कर. आणि तूं लो
कांस भीत होतास पण यापेक्षां त्वां ईश्वराला अधिक भ्यालें
पाहिजे. मग जेईदाला आपल्या बायकोविषयीं जें सव
ठरवायाचें होतें तें त्याने ठरविलें. तेव्हां आह्मी ती तुल
लग्नाने दिल्ही आहे. तर सर्व जे मुसलमान त्यांच्य
दत्तपुत्रांच्या बायकांविषयीं जें ठरवायाचें तें ठरविल्याव
त्यांसीं लग्न करितात त्यांस कांहीं दोष न लागावा ह्मणू
असें करण्याविषयीं ईश्वराचा हुकूम आहे." ह्याच सुऱ्या
मध्यें जितक्या पाहिजेत तितक्या बायका कराव्या असं
मुभा महमदाला दिल्ही आहे. ह्या कामांत कामातुरपण
ढोंग, धूर्तता किंवा ईश्वरनिंदा यांतून कोणता प्रकार स
र्वांहून वाईट आहे हें कोणालाहि फारकरून सांगतां येत
नाहीं.

ईश्वरी धर्माचें निमित्त करून असी अन्यायाची त्यांत मिसळ करणें हें अंतःकरणाला त्रासदायक आहे. महमदी धर्म आणि सर्व आवांतर खोटे धर्म यांमध्यें मोठा संबंध आहे असें सहज लक्षांत येईल. सर्व खोटे धर्म ज्या दुर्वासनांला मोकळीक देतात त्यांचा सत्य धर्म प्रतिबंध करितो.

पुढील वर्षांत तर बहुत अरबी कुळांवर स्वाऱ्या केल्या होत्या त्यांविषयीं फार सांगण्याची गरज नाहीं; तरी त्या स्वाऱ्यांमध्यें महमदाची वहिवाट कसी होती आणि आपले शिष्य पुढल्या वर्षांत विजय प्राप्त होण्यासाठीं त्याने कसे तयार केले हें दिसून येईल. जेईदाने सत्तर मनुष्यांनिशीं एक मातब्बर काफला लुटला. मोसलेम लोकांस कान्स्तांतिनोपलच्या हिराक्लियस बादशाहापासून त्याच्या रयतेसीं व्यवहार करण्याची ज्या वकिलाने परमानगी मिळविली होती तो मदिनेस परत येतांना हिस्माच्या खोऱ्यांत अलहोरीद याने त्याला लुटिलें. परंतु जेईदाने पांचशें मुसलमानानिशीं त्या लुटाऱ्यांवर जाऊन त्याचा पुत्र आणि तरकरून त्याचीं सर्व माणसें यांसुद्धां त्याला जिवें मारिलें. फिरास्ती लोकांपैकीं आठ असामी यानी महमदाचा धर्म स्वीकरला आणि ते दुखण्यास पडले असतां त्याने सांगितल्याप्रमाणें बरे झाले होते; मग त्यानी त्याच्या मेंढक्यांस मारिलें व त्याचे उंट चोरून नेले यावरून त्यांस मदिनेस आणविलें आणि लाल जरद तापविलेल्या लोखंडाने त्यांचे डोळे उपटून काढिले, त्यांचे हातपाय तोडून टाकिले आणि वधस्तंभावर मोठ्या दुःखाने त्यांस मारलें.

सुमारें ह्या वेळेस कित्येक ख्रिस्ती अरबी यानी हा

धर्म अंगिकारिला असें एक इतिहासक लिहितो. अब्दूल काहमान याने जीं प्रमाणें दाखविलीं त्यांवरून दौमत अल जंदल नामें राजा वळला. आणि त्याचा कित्ता बहुतकरून त्याच्या सर्व प्रजेने घेतला होता. जे सर्व आपल्या पूर्व धर्मांत टिकून राहिले त्यांजवर कर बसविला. ह्या यशस्वी उपदेशकाने त्या राजाच्या कन्येसीं लग्न केलें. आणि त्यांचा औरस पुत्र तर मदिनेमध्यें महमदी धर्माचा नामांकित शास्त्री झाला.

मुस्तलेकी नामें एक पराक्रमी कूळ यानीं आपला सरदार अल हारेथ यासहवर्तमान मोसलेम लोकांवर हल्ला करण्यासाठीं मोठी जमात मिळविली. महमद त्यासीं अलमोरैसी याच्या मैदानांतलि एका विहिरीजवळ भिडला. हें ठिकाण समुद्रापासून अर्धाच कोस व हास्फान यापासून दाहा कोस दूर आहे. अलहारेथाला एक तीर लागून तो मरण पावला. ह्या लढाईमध्यें महमदाला असा पूर्ण जय प्राप्त झाला कीं प्राचीन लोककथेंत याप्रमाणें गाजत आलें आहे कीं "त्याच्या पक्षी गाब्रियेल प्रगट झाला होता. तो शुभ्र वस्त्रें परिधान केलेला असतां जो घोडा कधींहि पाहण्यांत आला नाहीं अशावर स्वार झाला होता." जोवैरा नामें अलहारेथाची कन्या ही थाबेत याच्या वाट्यास आली परंतु महमद तिच्या सौंदर्याला मोहित झाल्यावरून त्याने तिला त्यापासून विकत घेतलें आणि त्याच्या बायकांमध्यें तीहि गणली गेली. ह्या लग्नाने त्या कुळासीं जो संबंध झाला तो संबंध महमदाला मोठ्या फायद्याचा होता.

ह्या स्वारींत आयेशा ही आपल्या नवऱ्याबरोब

होती. मदिनेस परत येतांना सैन्याचा रात्रीं कूच झाला असतां मदिना तेथून फार लांब नव्हती, तेव्हां तिला आपल्या सांडणीवरून उतरण्याचें कारण पडलें होतें; आणि ती परतून सांडणीवर बसणार होती इतक्यांत आपली द्वाफर आरक्त पाषाणाचा हार गमावला आहे असें तिला समजलें, ह्मणून त्याच्या शोधार्थ ती माघारी गेली. ती अंबारींत बसली आहे असें समजून सेवकांनी ती अंबारी पुन्हा सांडणीवर ठेवून ते पुढें चालते झाले. इकडे ती परत त्या रस्त्यावर येऊन पाहती तों सांडणी नाहीं ह्मणून ती पुढल्या ठिकाणीं पायीं गेली पण कोणी भेटला नाहीं. मी नाहीं असें पाहून माझा शोध करीत ते लोक येतील असें समजून ती तेथेंच थांबली असता झोंपीं गेली. सकाळीं महमदाचा एक सरदार साफवान याला ती आढळली. “आह्मी ईश्वराचे आहोंत आणि त्याकडेसच परत जाणार” हे शब्द हळु हळु बोलून त्याने तिला जागें केलें. तिने तोंडावरून बुरखा घेतला असतां त्याने तिला आपल्या उंटावर बसवून त्या सैन्यास आटोपेपर्यंत तो वाजूने पायीं चालत गेला. दुपार झाली असतां ती फार थकली होती. ह्या गोष्टीवरून संशयाविष्ट लोकांमध्यें विकल्प उठला. आणि त्यांतील कित्येकांनी आयेशेवर आळ घेऊन तिचा नाश करण्याचा रंग आणिला. बाहेरील गोष्टींवरून आणि आयेशेने जें सांगितलें त्यावरून महमदाला काय वाटलें असेल तें वाटो, तथापि ममतेने नाहीं तरी चातुर्याने तिची अब्रू बचावण्याविषयीं त्याने आपली नेहमीची युक्ति योजिली. ह्मणजे बनावटी हुकूम प्रगट

केला. "ज्या लोकानी हें तुफान घेतलें ते तुमच्यांतील एक जमात आहे. हें तुमच्या वाईटासाठीं आहे असें नाहीं पण बऱ्यासाठीं आहे असें समजा. प्रत्येकाकडून जितका दोष घडला असेल त्याप्रमाणें त्याला मिळेल, आणि ज्याने त्याचें मोठें ओझें उचललें आहे त्यास मोठी शिक्षा आहे." (कुरान सुरा २४.)

मक्केपासून महमद पळून गेल्याला साहा वर्षें झालीं असतां त्या नगराची शांतीने भेट घ्यावी असा हेतु धरून चौदाशें मनुष्यानिशी तो तेथें पोहंचला. जेव्हां तो त्या पुण्यभूमीच्या मर्यादेवर अलहोदे बीरगा एथें पोहं-चला तेव्हां कोरेश लोकानी त्याकडे निरोप पाठवून सां-गितलें कीं तुह्माला मक्केंत आह्मी येऊं देत नाहीं. या-करितां बळेंच आंत शिरावें असा त्याने निश्चय केला. इकडे कोरेश लोक विरोध करण्याचा डौल दाखवीत असतां महमदाने ओथमानाला सल्याचें बोलणें लावण्या-विषयीं पाठविलें. परंतु त्याला त्यानी कैद केलें. मक्के-कर ऐंशीं माणसें हेरावयास पाठविलीं असतां धरलीं गेलीं, पण त्यांस महमदाजवळ आणिलें तेव्हां त्याने त्यास सोडून दिल्हें, यावरून उभय पक्षांमध्यें तह झाला. तो तहनामा लिहिण्यांत कोरेश लोकांच्या वकिलानी मोठा दुराग्रह धरिला. महमदाने आलीला सांगितलें कीं आरंभीं "बिस्मिल्लाःहि रहेमा निर्रहीम," असें लिहावें. मक्केंतील मनुष्यांनी "हे आल्ला, तुझ्या नामाने" असा प्रा-रंभ करण्याविषयीं आग्रह धरिला होता. मग त्याने आ-पणाला "महमद रसूल आल्ला" हें नांव घेतलें त्यावरून अर्थांतच त्यानी तकरार केली कीं "जर आह्मी तुला

रसूल आल्ला असें कबूल केलें असतें तर आल्लाकडून सहसा तुला अडथळा झाला नसता." प्रतिपक्षाच्या दुराग्रही भाषणाविषयीं महमद कांहीं आढेवेढे न घेतां मान्य झाला हें त्याच्या शिष्यांस बरें वाटलें नाहीं. याकरितां ते सम्मत देण्यास उशीराने मान्य झाले. त्या तहनाम्यांतील हसील असा कीं दाहा वर्षेपर्यंत हा तहनामा चालेल आणि पुढल्या वर्षीं मक्केतील देऊळ पाहण्यास महमदाला तीन दिवसांची परवानगी दिल्ही आहे.

महमदाची जी मानमान्यता त्याच्या शिष्यांकडून होई ती आर्वा जो थाकिफी याने जें वर्णन केलें त्यावरून ध्यानांत येईल. याला मक्केपासून त्याच्या लष्कराकडे होदेबिर्गा एथें पाठविलें होतें. तो ह्मणतो, "मी इरानी राजाची सभा व रोमी बादशाहाचीहि सभा पाहून चुकलों पण महमदाची जसी मानमान्यता त्याचे सोबती करितात तसें कोणत्याहि राजाची करितांना माझ्या पाहण्यांत आली नाहीं. नमाजाच्या पूर्वीं तो हातपाय धुतो तेव्हां ते धावून त्याचें सांडलेलें पाणी तीर्थ असें घेतात. तो थुंकतो तेव्हां तो त्याचा प्रसाद मानून ते चाटितात. त्याचा गळून पडलेला प्रत्येक केस ते परम नम्र बुद्धीने जमा करितात." महमदाला आपल्या लोकांमध्यें जय प्राप्त झाल्यावरून धैर्य आलें असतां आसमंतातच्या राजांस आपल्या धर्मांत आणावें असी त्याने हिम्मत धरली [illegible] ल्या कागदपत्रावर "महमदरसूल आल्ला [illegible] मोर्तब करीत असे.

त्याने पहिलें पत्र इरानी राजा खोस्रू याकडे [illegible] होतें. खोस्रू या नांवाअगोदर महमदाने आपलें नां[illegible]

तलें असें राजानें पाहून त्यानें त्या पत्राच्या चिंधाड्या केल्या आणि अति क्रोधाविष्ट होऊन त्या वकिलाला माघारें पाठविलें. महमदानें याविषयीं ऐकिलें असतां तो ह्मणाला, "ईश्वर त्याचें राज्य याचप्रमाणें फाडून टाकील."

हराक्लियस बादशाहा सुरियांत असतां त्याकडे याच प्रकारचें पत्र दोजाइअन कालैफा याच्या हातें पाठविलें होतें. त्यानें तें पत्र बाहेरील सर्व प्रकारच्या आदरानें घतलें आणि देणगी देऊन त्या वकिलाची रवानगी केली त्यावरून मुसलमान लोक ह्मणतात कीं 'जर तो राजा आपल्या गादीविषयीं निर्भय असता तर अरबी धर्माचा स्वीकार करिता.' कोप्त लोकांच्या राजाला हराक्लियसानें मिसराचा गवर्नर करून पाठविलें होतें. पारस लोकांनीं कान्स्तांतिनोपलाला वेढा घातला त्या दिवसापासून त्यानें या प्रांताचा वसूल अटकावून ठेविला होता. महमदानें जसें त्या बादशाहाकडे पत्र पाठविलें होतें त्या मजकुराचें या राजाकडेहि पाठविलें. मुकौकस हें त्या राजाचें नांव होतें. यानें तें पत्र मोठ्या आदरानें हृदयीं धरून ज्या हस्तिदंती करंड्यांत तो आपली मोतीं ठेवीत असे त्यांत तें ठेविलें. त्यानें अनुकूळ उत्तरासहित चार मोलवान रत्नें व दोन कोप्त कन्या असा महमदाला नजराणा पाठविला. यांतील एक जी मरियम ती महमदाचा पुत्र इब्राहीम त्याची आई होती. हाबशी लोकांच्या राजाला ज्यानें संकटाच्या वेळीं महमदाच्या अनुयायांस मित्रत्वानें अंगिकारिलें होतें त्यास यानें मोलांब पत्र पाठविलें. त्या राजाला तें पत्र पावल्यावर त्यानें तें आपल्या डोळ्यावर ठेविलें. मग सिंहासनावरू

ठून नुसत्या भूमीवर बसला. अरबी पैगंबरच्या धर्मावर
झा विश्वास आहे असें त्याने बोलून तें पत्र हस्तिदंती
दुकेमध्यें ठेविलें आणि महमदाला नम्रतेचें व मान्यतेचें
त्तर पाठविलें.

याप्रमाणें दुसऱ्या कित्येकांस पत्रें पाठविलीं आणि त्यां-
रून भिन्न भिन्न परिणाम झाले.

कुरानांतील शेवटचे दोन सुरे हे आमच्या पैगंबरावर
ादू चालविली होती तिच्या चमत्कारिक गोष्टीविषयीं
ाहेत असें मुसलमानी टीकाकार ह्मणतात. ते येणेंप्र-
णें. "तूं सांग, मी प्रभाताच्या प्रभूकडे आश्रयाक-
तां आलों अशासाठीं कीं प्रत्येक वस्तु जी त्याने निर्माण
ली तिच्या बाधेपासून व रात्र येती तेव्हां अंधाराच्या
धेपासून व गांठीमध्यें फुंकणाऱ्या स्त्रियांच्या बाधेपासून
ाणि हेवायुक्त मनुष्य हेवा करितो तेव्हां त्याच्या बाधे-
ासून त्याने मला सोडवावें." "तूं सांग, लोकांचा प्रभु,
ोकांचा बादशाह, लोकांचा पूज्यमान त्याच्या आश्रया-
ालीं आलों, यासाठीं कीं जो कुजबुजतो व लपतो त्या-
या बाधेपासून आणि जो लोकांच्या अंतःकरणांत भूतें
वा मनुष्यें यांकडून कुकल्पना भरितो त्यापासून राखा-
." या वाक्यावर टीका असी आहे कीं लोबीद नांवें
का यहूदीने आपल्या कन्येच्या सहायाने महमदाला
ादू केली. ह्मणजे त्यानी एका दोरीला अकरा गांठी
रून ती एका आडांत लपविली, त्यावरून महमद [illegible]
ा पडला. तेव्हां ईश्वराने हा सुरा व दुसरा ए[illegible]
पाठविले. आणि यांचें काय करावें व तीं [illegible]
ठें लपविली याविषयीं हजरत गाब्रीएल याने [illegible]

